**मा. उच्च न्यायालय, मुंबई तसेच नागपूर व औरंगाबाद खंडपीठ येथील आस्थापनेवर तांत्रिक संवर्गातील विविध पदे निर्मितीबाबत.**

# महाराष्ट्र शासन
## विधि व न्याय विभाग
## शासन निर्णय क्रमांकः पदनि-५९१५/९१/प्र.क्र. १२/का.-चार

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
तारीख: ३१ जानेवारी, २०१८.

**संदर्भ -**

१. प्रबंधक (प्रशा.), अपील शाखा, उच्च न्यायालय यांचे पत्र क्र.C.१५११/२०१३/Tech.manpower/६१९६, दि. ११/०८/२०१६, दि. २३/०६/२०१६, दि. १५/०७/२०१६ व दि. २९/०१/२०१८.

**प्रस्तावना -**

मा. उच्च न्यायालय, मुंबई, त्याची नागपूर व औरंगाबाद खंडपीठे तसेच राज्यातील दुय्यम न्यायालयांच्या कामकाजात डिजिटल केस डिस्प्ले, सेंट्रलाईज्ड ई फायलिंग सिस्टिम, ई कोर्ट प्रोजेक्ट यासारख्या बाबींमुळे माहिती व तंत्रज्ञानाचा वापर मोठ्या प्रमाणात वाढला आहे. उच्च न्यायालयांच्या यासंबंधी संगणकीकरण विषयक कामांचे मा. सर्वोच्च न्यायालयद्वारे परीक्षण करण्यात येत आहे. यानुषंगाने उच्च न्यायालयाने तांत्रिक ज्ञान असणाऱ्या तांत्रिक संवर्गातील विविध पदांच्या निर्मितीचा प्रस्ताव शासनाच्या मान्यतेसाठी सादर केला होता. उच्च न्यायालयाच्या सदर प्रस्तावास मा. मुख्यमंत्री व मा. मुख्य न्यायमूर्ती, उच्च न्यायालय, मुंबई यांच्या दि. १८/०४/२०१६ रोजी संपन्न झालेल्या बैठकीत शासनाची सहमती दर्शविण्यात आली होती. तसेच सदर बैठकीतील निर्णयानुसार प्रस्तावांतर्गत तांत्रिक संवर्गातील पदनिर्मितीबाबत महाप्रबंधक, उच्च न्यायालय, मुंबई, संचालक, माहिती तंत्रज्ञान आणि प्रधान सचिव व विधि परामर्शी, विधि व न्याय विभाग यांच्यात दि. १७/०६/२०१६ रोजी बैठक आयोजित करण्यात आली होती. या बैठकीतील निर्णयास अनुसरून संचालक, माहिती तंत्रज्ञान यांनी उच्च न्यायालयाने प्रस्तावित केलेल्या माहिती तंत्रज्ञानाशी संबंधित विविध संवर्गातील ३७ पदांपैकी त्यांच्या कामाचे स्वरूप विचारात घेऊन ११ पदे उच्च न्यायालयाच्या आस्थापनेवर कायमस्वरूपी निर्माण करण्यास तर २६ पदांची कामे बाह्ययंत्रणेद्वारे करण्याबाबतचे अभिप्राय दिले होते. त्यानुसार सदर प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

## शासन निर्णय-

मा. उच्च न्यायालय, मुंबई अपील शाखा व त्याची नागपूर व औरंगाबाद खंडपीठे यांच्या आस्थापनेवर खालील तक्ता क्र. १) येथील विविध संवर्गातील ११ पदे कायमस्वरूपी निर्माण करण्यास आणि त्यानुषंगाने येणाऱ्या वार्षिक आवर्ती रु. ८२,११,६००/- इतक्या खर्चास तसेच तक्ता क्र. २) येथील विविध संवर्गातील २६ पदांची कामे बाह्ययंत्रणेद्वारे करण्यास आणि त्यानुषंगाने येणाऱ्या वार्षिक आवर्ती अंदाजे रु. १,१५,८०,५७६/- इतक्या खर्चास सदर शासन आदेशाद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

**१) कायमस्वरूपी निर्माण करावयाच्या ११ पदांचा तपशील**

| अ. क्र. | पदनाम | वेतनश्रेणी | पदांची संख्या | उच्च न्यायालय खंडपीठ निहाय निर्माण करावयाची पदे | या पदासाठी वेतन व भत्ते यासाठी होणारा मासिक आवर्ती खर्च | या पदांसाठी वेतन व भत्ते यासाठी होणारा वार्षिक आवर्ती खर्च |
|---|---|---|---|---|---|---|
| १. | प्रबंधक (माहिती तंत्रज्ञान) | ३७४००-६७००० + ग्रेड पे ८७०० | १ | मुंबई १ | ९२,८९६ x १ = ९२,८९६/- | ११,१४,७५२ x १ = ११,१४,७५२/- |
| २. | उप प्रबंधक (माहिती तंत्रज्ञान) | १५६००- ३९१०० + ग्रेड पे ७६०० | १ | मुंबई १ | ८३,७०८ x १ = ८३,७०८/- | १०,०४,४९६ x १ = १०,०४,४९६/- |
| ३. | सहायक प्रबंधक (माहिती तंत्रज्ञान) | १५६००-३९१०० + ग्रेड पे ६६०० | ३ | मुंबई - १<br>नागपूर - १<br>औरंगाबाद - १ | ७३,२६६ x ३ = २,१९,७९८/- | ८,७९,१९२ x ३= २६,३७,५७६/- |
| ४. | हार्डवेअर इंजिनियर | ९३००-३४८०० + ग्रेड पे ४४०० | ३ | मुंबई - १<br>नागपूर - १<br>औरंगाबाद - १ | ४७,९८३ x ३ = १,४३,९४९/- | ५,७५,७९६ x ३ = १७,२७,३८८/- |
| ५. | सॉफ्टवेअर इंजिनियर | ९३००-३४८०० + ग्रेड पे ४४०० | ३ | मुंबई - १<br>नागपूर - १<br>औरंगाबाद - १ | ४७,९८३ x ३ = १,४३,९४९/- | ५,७५,७९६ x ३ = १७,२७,३८८/- |
| **एकुण** | | | **११** | **११** | **६,८४,३००/-** | **८२,११,६००/-** |

**२) बाह्ययंत्रणेद्वारे भरावयाच्या २६ पदांचा तपशील**

| अ. क्र. | पदनाम | पदांची संख्या | उच्च न्यायालय खंडपीठ निहाय पदांचा तपशील | या पदांसाठी वेतन व भत्ते यासाठी होणारा अंदाजे वार्षिक आवर्ती खर्च |
|---|---|---|---|---|
| १. | सॉफ्टवेअर प्रोग्रॅमर | १० | मुंबई - ६<br>नागपूर - २<br>औरंगाबाद - २ | ४९,०७,३२८/- |
| २. | हार्डवेअर असिस्टंट | ८ | मुंबई - ४<br>नागपूर - २<br>औरंगाबाद - २ | ३६,९१,१०४/- |
| ३. | कंन्सोल ऑपरेटर | ८ | मुंबई - ४<br>नागपूर - २<br>औरंगाबाद - २ | २९,८२,१४४/- |
| | एकूण | २६ | २६ | १,१५,८०,५७६/- |

२. वरीलप्रमाणे मंजूर करण्यात आलेली ११ कायमस्वरुपी पदे विहीत पध्दतीने सेवाप्रवेश नियम तयार करुन भरण्याबाबतची कार्यवाही उच्च न्यायालय प्रशासनाने करावी.

३. कायमस्वरूपी नवीन पदनिर्मितीमुळे होणारा खर्च हा "मागणी क्र. जे-१, २०१४ न्यायदान (००), १०२ उच्च न्यायालये (०३) (०१) प्रबंधक, अपील शाखा (२०१४ ००९२) (अनिवार्य) ०१ वेतन" या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व या लेखाशीर्षांखालील त्या त्या वित्तीय वर्षाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा. तसेच बाह्ययंत्रणेद्वारे भरावयाच्या पदांच्या अनुषंगाने होणारा आवर्ती खर्च "मागणी क्र. जे-१, २०१४ न्यायदान (००), १०२ उच्च न्यायालये (०३) (०१) प्रबंधक, अपील शाखा (२०१४ ००९२) (अनिवार्य) १३ कार्यालयीन खर्च" या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व या लेखाशीर्षांखालील त्या त्या वित्तीय वर्षाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

४. प्रस्तुत शासन निर्णय उच्चस्तर सचिव समिती तसेच मंत्रिमंडळ मान्यतेअन्वये तथा सक्षम प्राधिकाऱ्यांच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०६०४१६५२०६४०१२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sanjeev R Keluskar

Digitally signed by Sanjeev R Keluskar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Law and Judiciary Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=4a521517a0d3fba83ff4473cb0d448a75f9b7f83cba41836833b60c93758c804, cn=Sanjeev R Keluskar
Date: 2018.06.04 16:51:39 +05'30'

**( संजीव केळुसकर )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा. विरोधी पक्षनेता, विधानसभा/विधानपरिषद, विधानभवन, मुंबई.
२. मा. मुख्य सचिव तथा अध्यक्ष, उच्चस्तर सचिव समिती यांचे कार्यालय, मंत्रालय, मुंबई
३. महाप्रबंधक, मुंबई उच्च न्यायालय, मुंबई.
४. महालेखापाल (लेखापरीक्षा/लेखा अनुज्ञेयता),महाराष्ट्र-एक, मुंबई.
५. महालेखापाल(लेखापरीक्षा/लेखा अनुज्ञेयता),महाराष्ट्र-दोन, नागपूर.
६. प्रबंधक, अपील शाखा, उच्च न्यायालय, मुंबई
७. प्रबंधक, मूळ शाखा, उच्च न्यायालय, मुंबई
८. प्रबंधक (प्रशासन), मुंबई उच्च न्यायालय, खंडपीठ नागपूर/औरंगाबाद
९. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१०.निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
११.जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर/औरंगाबाद
१२.वित्त विभाग, व्यय-६/अर्थ ११/वित्तीय सुधारणा
१३.कार्यासन अधिकारी, का. २३/२५, विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई
१४.निवड नस्ती.